विशेष मागास प्रवर्गातील ज्या जाती इतर मागासवर्गीय म्हणून समाविष्ट होत्या त्यांना जातीचे प्रमाणपत्र देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
शासन परिपत्रक, क्रमांक: सीबीसी-1095/प्र.क्र.264/मावक-5,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-400 032, दिनांक 24 ऑक्टोबर, 1995.

वाचा :- (1) समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक: सीबीसी-1494/प्र.क्र.236/मावक-5 दिनांक 13 जून, 1995.

(2). शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक: सीबीसी-1494/प्र.क्र.236/मावक-5, दिनांक 24 ऑगस्ट, 1995.

शासन परिपत्रक :- शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक: सीबीसी-1494/प्र.क्र.236/मावक-5, दिनांक 13 जून 1995 अन्वये काही विशिष्ट जातींचा समावेश विशेष मागास प्रवर्गामध्ये केला आहे. व या जातींना 2% आरक्षण म्हणून शासकीय सेवेमध्ये ठेवण्याचा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:बीसीसी-1094/प्र.क्र.68/94/16-ब, दिनांक 15 जून 1995 अन्वये घेतला आहे. त्याचप्रमाणे शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक:एडीएम-1194/सीआर-215/95/शिक्षण, दिनांक 21 जून 1995 अन्वये वैद्यकीय व तत्सम अभ्यासक्रमाच्या प्रवेशासाठी 2% आरक्षण लागू करण्यात आले. वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या दिनांक 21 जून 1995 च्या आदेशान्वये वैद्यकीय तत्सम अभ्यासक्रमाला जे 2% आरक्षण लागू केले होते, त्या शासन निर्णयास उच्च न्यायालय, मुंबई येथे याचिका क्र.1318/95 दाखल करुन आव्हान दिले होते. या याचिकेवर उच्च न्यायालयाने दिनांक 19 जुलै 1995 रोजी दिलेल्या अंतरिम आदेशाच्या अनुषंगाने दिनांक 21 जून, 1995 च्या वरील शासन निर्णयास दिनांक 24 जुलै 1995 च्या शासन निर्णयान्वये स्थगिती देण्यात आलेली आहे. त्यामुळे ज्या विशेष मागास प्रवर्गात ज्या जाती आहेत त्यांना देण्यात आलेल्या आरक्षणास स्थगिती देण्यात आलेली आहे. यापूर्वी विशेष मागास प्रवर्गातील काही जाती इतर मागासवर्गामध्ये समाविष्ट होत्या. त्या जातीच्या व्यक्तींना विशेष मागास प्रवर्गात समावेश केल्यामुळे इतर मागासवर्गाचे असल्याचे जातीचे प्रमाणपत्र मिळत नाही व विशेष मागास प्रवर्गाच्या जातीचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घेतले तरी स्थगिती आदेशामुळे आरक्षणाचा फायदा उपलब्ध होत नाही. हे विचारात घेउन ज्या जातींचा यापूर्वी इतर मागासवर्गात समावेश होता व आता विशेष मागास प्रवर्गात आहेत, त्यांना याचिका क्रमांक: 1318/95 वर अंतिम निर्णय होईपर्यन्त तसेच क्रिमिलिअरचे प्रमाणपत्र योग्य त्या पध्दतीचा अवलंब करुन इतर मागासवर्गात असल्याचे जातीचे प्रमाणपत्र देण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

स. नु. मावीत,
कक्ष अधिकारी.

प्रति

महालेखापाल, महाराष्ट्र-1/2, मुंबई/नागपूर,
सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
मुख्य महानगर दंडाधिकारी,
सर्व जिल्हा दंडाधिकारी,
सर्व तालुका कार्यकारी दंडाधिकारी,
सर्व विभागीय आयुक्त,
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
आयुक्त, आदिवासी कल्याण, महाराष्ट्र राज्य, नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
सहसंचालक (जाप्रत), समाजकल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
समाजकल्याण अधिकारी, बृहन्मुंबई, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,

त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदर आदेश त्यांचे अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांचे निदर्शनास आणून द्यावेत.

सर्व कार्यासने, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
निवड नस्ती, मावक-5.

---

* पत्राद्वारे.